प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत सविस्तर प्रकल्प अहवाल (**DPR Based Stream**) या योजनेच्या सन २०२५-२६ करिता मंजूर ₹५०६४७.९१ लक्ष रक्कमेच्या वार्षिक कृति आराखड्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. कृवपदुम-२५०३७/६/२०२५-MAG-१४A**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ एप्रिल, २०२५

**वाचा :** १) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली झालेली ३७ व्या राज्य स्तरीय मंजुरी समीतीची बैठक दिनांक २४.०३.२०२५.
२) कृषि व पदुम विभाग शासन पत्र क्र. केंपुयो-२०२५/प्र.क्र.१४/२-अे, दिनांक ०३.०४.२०२५.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या दिनांक ०६.०४.२०२२ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना-रफ्तार ची राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया या नावाने पुनर्ररचना केली असून त्यामध्ये वार्षिक कृती आराखडा आधारित व सविस्तर प्रकल्प अहवाल आधारित या दोन शाखांचा समावेश आहे. सदर योजनेंतर्गत राष्ट्रीय कृषि विकास योजना (DPR Based Stream) ही केंद्र पुरस्कृत योजना केंद्र व राज्य शासनाच्या अनुक्रमे ६०:४० प्रमाणात अर्थसहाय्याने राबविण्यात येते. केंद्र शासनाच्या दिनांक २०.११.२०२४ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेचे नाव प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना असे करण्यात आले आहे.

संदर्भीय दिनांक ०३.०४.२०२५ रोजीच्या पत्रान्वये कृषि विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध केंद्र पुरस्कृत योजनांचा मंजूर नियतव्यय कळविलेला आहे. दिनांक २४.०३.२०२५ रोजी झालेल्या राज्य स्तरीय मंजूरी समितीच्या बैठकीमध्ये प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना - सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR Based Stream) योजनेच्या ₹५०६४७.९१ लक्ष (केंद्र हिस्सा ₹३०३८८.७५ लक्ष आणि राज्य हिस्सा ₹२०२५९.१६ लक्ष) इतक्या रकमेच्या वार्षिक कृति आराखड्यास मंजूरी दिली असल्याचे संदर्भिय पत्रान्वये कळविण्यात आले आहे.

त्यानुसार, प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना - सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR Based Stream) घटकाच्या सन २०२५-२६ करिता ₹५०६४७.९१ लक्ष (केंद्र हिस्सा ₹३०३८८.७५ लक्ष आणि राज्य हिस्सा ₹२०२५९.१६ लक्ष) रक्कमेच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०२५-२६ मध्ये प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना - सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR Based Stream) घटकाच्या योजनेची राज्यात अंमलबजावणी करण्यासाठी ₹५०६४७.९१ लक्ष (केंद्र हिस्सा ₹३०३८८.७५ लक्ष आणि राज्य हिस्सा ₹२०२५९.१६ लक्ष) निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. त्याचा प्रवर्गनिहाय तपशिल खालीलप्रमाणे आहे.

| | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | एकूण |
|---|---|---|---|
| **सर्वसाधारण प्रवर्ग** | २४४४६.२५ | १६२९७.५० | ४०७४३.७५ |
| **अनुसूचित जाती** | ३३१७.५० | २२११.६६ | ५५२९.१६ |
| **अनुसूचित जमाती** | २६२५.०० | १७५०.०० | ४३७५.०० |
| **एकूण..** | ३०३८८.७५ | २०२५९.१६ | ५०६४७.९१ |

२. या योजनेंतर्गत वितरित करण्यात येणारा निधी केंद्र हिस्सा व राज्य हिश्याच्या पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०२५-२६ मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदींतून खर्च करण्यात यावा.

| सर्वसाधारण प्रवर्ग | |
|---|---|
| **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** |
| मागणी क्र. डी-३<br>२४०१ पीक संवर्धन<br>(००) (८००) इतर खर्च<br>(००) (०९) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत अर्थसहाय्य (कें.पु.यो.) (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम)<br>(२४०१ ८२३५) ३३ - अर्थसहाय्य | मागणी क्र. डी-३<br>२४०१ पीक संवर्धन<br>(००) (८००) इतर खर्च<br>(००) (११) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत अर्थसहाय्य (कें.पु.यो.) (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम)<br>(२४०१ A२२५) ३३ - अर्थसहाय्य |

| अनुसूचित जाती प्रवर्ग | |
|---|---|
| **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** |
| मागणी क्र. एन-३<br>२४०१ पीक संवर्धन<br>(००) (७८९) अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना<br>(०१) (१५) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजनांतर्गत अर्थसहाय्य<br>(केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम)<br>(२४०१ B२२१), ३३- अर्थसहाय्य | मागणी क्र. एन-३<br>२४०१ पीक संवर्धन<br>(००) (७८९) अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना<br>(०१) (१६) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम)<br>(२४०१ B२३२), ३३- अर्थसहाय्य |

| अनुसूचित जमाती प्रवर्ग | |
|---|---|
| **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** |
| मागणी क्र. टी-५<br>२४०१ पीक संवर्धन<br>(००) (७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (३२) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत अर्थसहाय्य<br>(केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम)<br>(२४०१ A७४४), ३३-अर्थसहाय्य | मागणी क्र. टी-५<br>२४०१ पीक संवर्धन<br>(००) (७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (३३) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम)<br>(२४०१ A७५३), ३३-अर्थसहाय्य |

३. या योजनेंतर्गत वितरीत निधीचे वितरण करण्याकरिता आयुक्त (कृषि) ), कृषि आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सर्व अंमलबजावणी यंत्रणांनी / विभागांनी त्यांना सन २००७-०८ ते सन २०२४-२५ या कालावधीत या योजनेंतर्गत वितरित केलेल्या निधीचे सनदी लेखापालांकडून लेखापरिक्षण झाल्याचे प्रमाणित करावे.

५. या योजनेंतर्गत वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR Based Stream) योजनेच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. लाभार्थ्यांना अनुदान वाटप करताना शासनाद्वारे वेळोवेळी विहीत केल्या जाणाऱ्या मार्गदर्शक सूचनांचा अवलंब करण्यात यावा. सदर योजनेच्या लाभार्थ्यांची निवड महा-डीबीटी प्रणालीद्वारे करण्यात यावी व लाभार्थ्यांना अनुदानाचे वाटप आधार संलग्न बँक खात्यावर करण्याकरिता सार्वजनिक वित्त व्यवस्थापन प्रणालीचा वापर करावा.

७. या योजनेंतर्गत वितरीत निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठवावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०४२२१२३९११८९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by AMBADAS SAHEBRAO CHANDANSHIVE
Date: 2025.04.22 12:40:16 +05'30'

**(अं.सा. चंदनशिवे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम)), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन, राज्य उत्पादन शुल्क), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता विधानसभा/ विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
८. सर्व मा. संसद सदस्य/महाराष्ट्र विधानसभा सदस्य /महाराष्ट्र विधानपरिषद सदस्य
९. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
१०. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव (पशुसंवर्धन) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ, एपीजे हाऊस, मुंबई.
१७. राज्य सूचना अधिकारी, राज्य सूचना विज्ञान केंद्र, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१८. संचालक, माहिती तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
१९. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
२१. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
२२. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.
२३. वित्त विभाग (व्यय- १/अर्थसंकल्प १३), मंत्रालय, मुंबई.
२४. नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई.
२५. सर्व उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२६. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२७. निवडनस्ती (१४-अे कार्यासन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.